**उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर यांच्या अधिपत्याखालील नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या जिल्ह्यातील ५१ ग्रामीण रुग्णालयातील एकूण १३२० अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांक- ग्रारुप -२३१०/प्र.क्र. ५०/आरोग्य-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २ फेब्रुवारी, २०११.

**वाचा :** १) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक, दिनांक २०.१०.२०१०.

**शासन निर्णय :**

उपरोक्त शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर यांच्या अधिपत्याखालील नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या जिल्ह्यातील उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखाली ३० खाटांचे ५१ ग्रामीण रुग्णालयातील १२९३ अस्थायी पदे आणि अतिरिक्त ठरलेल्या परंतु ग्रामीण रुग्णालयात कार्यरत असलेल्या वाहन चालकांची एकूण ३१ पदांपैकी ४ वाहनचालकांची पदे सेवानिवृत्त/ समायोजनाने कमी करण्यात आली असल्यामुळे, सध्या कार्यरत वाहनचालकांची २७ पदे अशी एकूण १३२० अस्थाई पदे दिनांक ३१.१२.२०१० पर्यंत चालू ठेवण्यात आली होती. **सदर पदांचे स्थायीकरण करण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. ही कार्यवाही अद्याप पूर्ण झाली नसल्याने विचाराधीन** १३२० अस्थाई पदांना दिनांक १.१.२०११ ते दिनांक २८.२.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१०-२०११ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक - आर - १**

**१)** " २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६- सार्वजनिक आरोग्य
००१ - संचालन व प्रशासन
(०१)(०८)- प्राथमिक आरोग्य केंद्रांचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३)"

२) " २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६- सार्वजनिक आरोग्य
१० - किमान गरजा कार्यक्रम
प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरिता योजना
स्थानिक क्षेत्रातील योजना ( राज्य योजना)
(०१)(०७)- महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या कलम १८७ अन्वये योजनांकरिता अनुदाने
३१ - सहाय्यक अनुदाने (२२१० ३०६५)"

३)      " २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६- सार्वजनिक आरोग्य
०१० - किमान गरजा कार्यक्रम
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना-
(०१)(०२)      - प्रा.आ.केंद्राचा ग्रामीण रुग्णालया इतका दर्जा वाढविणे (२२१० ०५३१)"

३.      हा निर्णय वित्त विभागाच्या क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/ वित्तीय सुधारणा-१ दिनांक ४ ऑक्टोबर २००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.      सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक- २०११०२०३१९४१४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सुहास रा. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

संचालक, आरोग्य सेवा,मुंबई
सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
उपसंचालक, आरोग्य सेवा,नागपूर मंडळ, नागपूर
जिल्हा शल्य चिकित्सक, नागपूर /वर्धा / भंडारा / गोंदिया / चंद्रपूर / गडचिरोली
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर /वर्धा / भंडारा / गोंदिया / चंद्रपूर / गडचिरोली
वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालये (संबंधित)
(उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांचे मार्फत)
वित्त विभाग (व्यय-१३) (अर्थसंकल्प-१९) मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (आरोग्य-३)